**राज्य कामगार विमा योजना रूग्णालय वरळी मुलुंड व ,
नागपूर या ३ रूग्णालयांसाठी संबंधीत रूग्णालय विकास
समिती मार्फत X-ray machine ५००mA हे वैद्यकीय यंत्र
खरेदी संदर्भात सुधारित प्रशासकीय मान्यता....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकायो-२०१३/ प्र.क्र.२५४/१३/राकावि-२**
गो. ते. रूग्णालय आवार, १० वा मजला, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०९ डिसेंबर,२०१४

वाचा :-

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. राकायो-२०१३/प्र.क्र.२५४/१३/राकावि-२, दिनांक १५ ऑक्टोबर,२०१३ .**

२) **आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्र. आयुक्त/राकावियो/ वै.उ.ख./ एक्सरे५००एमए/ १२१६४-१६६/२०१४, दि. ५ नोव्हेंबर, २०१४.**

प्रस्तावना :-

वर अनुक्रमांक ( १ )येथे उल्लेखिलेल्या दिनांक १५ ऑक्टोबर,२०१३ च्या शासन पत्राद्वारे वरळी, मुलुंड आणि नागपूर राज्य कामगार विमा योजना रुग्णालयांकरिता प्रत्येकी १ याप्रमाणे रु. ७ लाख ते ८ लाख एवढया अंदाजित किंमतीची ३ X-ray machine ५००mA वैद्यकीय यंत्रे खरेदी करण्यासाठी एकूण अंदाजित खर्च रू.२४ लक्ष यास प्रशासकिय मंजूरी देण्यात आलेली आहे. तथापि प्रत्यक्षात आरोग्य सेवा संचालनालयातील खरेदी समितीमार्फत सदर यंत्र ई- निविदेद्वारे खरेदी करण्याची कार्यवाही केल्यानंतर एका यंत्राची किंमतच रू. २४लक्ष पेक्षा जास्त म्हणजे अंदाजीत रू.८ लक्ष च्या तिप्पटीपेक्षा जास्त आलेली आहे. आरोग्य सेवा संचालनालयाच्या खरेदी समितीने सदर वाढीव किंमतीबाबत तपासणी केली असता असे आढळून आले की रू.८लक्ष ही अंदाजित किंमत फार वर्षापासून वापरात येणा-या जुन्या व पारंपारिक पध्दतीच्या यंत्राची होती व कुठलाही बाजारभाव पडताळणी न करता देण्यात आली होती. जुन्या यंत्रामध्ये किरणोत्सर्ग (Radiation) होत होते मात्र ई-निविदेद्वारे खरेदी करावयाचे नवीन यंत्र हे आधुनिक तंत्राचे व कमी किरणोत्सर्ग होणारे आहे, त्यामुळे किंमतीत वाढ झालेली आहे.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन X-Ray Machine ५००mA हे वैद्यकीय यंत्र खरेदी करण्यासाठी शासनाच्या वर अनुक्रमांक (१) येथील दिनांक १५ ऑक्टोबर,२०१३ च्या पत्राद्वारे देण्यात

आलेल्या प्रशासकीय मान्यतेत बदल करून याद्वारे खालीलप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| क्र. | बाबयंत्रसामग्री/ | अंदाजे किंमत रू. | नगसंख्या/ | एकूण खर्च रु. |
|---|---|---|---|---|
| १ | X-Ray Machine ५००mA | रु.२२ लक्ष प्रति नग अधिक ऑक्ट्रॉय / LBT नियमानुसार ( जर Octroi/ LBT exemption certificate संबंधीत महानगर पालिकेने स्विकारण्यास नकार दिला तर) | ३ ( वरळी, मुलुंड आणि नागपूर रा.का.वि.यो. रुग्णालयांकरिता प्रत्येक १ याप्रमाणे | रु.६६ लक्ष्य प्रति नग अधिक ऑक्ट्रॉय / LBT नियमानुसार (जर Octroi/ LBT exemption certificate संबंधीत महानगर पालिकेने स्विकारण्यास नकार दिला तर ) |

२. सदर खर्चाचा भार राज्य कामगार विमा महामंडळाकडून उचलण्याच्या अटीवर सदर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०९१३२९४२६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gawde Aparna A

Digitally signed by Gawde Aparna A
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Gawde Aparna A
Date: 2014.12.10 13:02:53 +05'30'

( अपर्णा गावडे )
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा , मुंबई.
२. आयुक्त.मुबई ,राज्य कामगार विमा योजना ,
३. संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
४. वैद्यकीय अधीक्षक,राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वरळी/मुलुंड/नागपूर

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/नागपूर.
९. अवर सचिव, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई-१.
१०.निवड नस्ती (राकावि२-)